# महाराष्ट्र शासन

क्रमांक: गौखनि ३८/१०१८/प्र.क्र.३६३/ख,

महसूल व वन विभाग, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : ०८ सप्टेंबर, २०२०

<u>विषय : गौण खनिज-कोल्हापूर</u>
मौजे पारगाव पैकी निल्लेवाडी, ता. हातकणंगले या वाळूगटाचा ताबा न देता आल्यामुळे रक्कम परत करणेबाबत.
**मे.विशाखा विपूल ट्रेडर्स, प्रो.प्रा.प्रविण शंकर कांबळे.**

**<u>शासन ज्ञापन:</u>**

जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांना उपरोक्त विषयाबाबतचे पत्र क्र.कार्या/६अ/आरआर/८७०/ २०१९, दि.२७/०५/२०१९ रोजीच्या पत्रास अनुलक्षून असे कळविण्यात येते की, सन २०१६-१७ करीता ३६ वाळूगटांचा लिलाव करण्यात आला. सदर लिलावाच्या दि.३१/०१/२०१७ रोजी घेण्यात आलेल्या चौथ्या फेरीतील लिलावामध्ये मौजे पारगाव पैकी निल्लेवाडी, ता.हातकणंगले हा वाळूगट १४१३ ब्रासकरीता मे.विशाखा विपूल ट्रेडर्स, प्रो.प्रा.प्रविण शंकर कांबळे यांना रक्कम रू.३३,२८,३७८/- एवढ्या सर्वोच्च बोलीने मंजूर करण्यात आला. जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी कळविल्यानुसार लिलावधारक यांनी लिलावाची उर्वरीत रक्कम जमा केली. लिलावधारक यांनी लिलावाची संपुर्ण रक्कम शासनजमा केल्यानंतर जिल्हाधिकारी, कोल्हापूर यांनी दि.२०/०४/२०१७ रोजीच्या आदेशान्वये वाळूगट मंजूर केला.

२. परंतु, मा. राष्ट्रीय हरीत न्यायाधिकरण, नवी दिल्ली येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र.३६३/२०१५ व ३६६/२०१५ ते ३६८/२०१५ मधील दि.१९/०४/२०१७ चे आदेशाच्या अनुषंगाने शासनपत्र दि.२१/०४/२०१७ अन्वये प्राप्त सुचनेनुसार सक्शन पंपाद्वारे सुरू असलेले वाळू उत्खनन बंद करणेबाबत कळविण्यात आले. सदर आदेशामुळे क्षेत्रीय कार्यालयाकडून लिलावधारकास वाळूगटाचा ताबा दिला नाही.

३. सबब, मा. राष्ट्रीय हरीत न्यायाधिकरण, नवी दिल्ली येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्र.३६३/२०१५ व ३६६/२०१५ ते ३६८/२०१५ मधील दि.१९/०४/२०१७ चे आदेशाच्या अनुषंगाने क्षेत्रीय कार्यालयाकडून लिलावधारकास वाळूगटाचा ताबा न देता आल्यामुळे लिलावाची संपुर्ण रक्कम रू. ३३,२८,३७८/- इतकी रक्कम लिलावधारकास परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

५. श्री.कांबळे यांना रक्कम रु.३३,२८,३७८/- (रुपये तेहतीस लाख अठ्ठावीस हजार तीनशे अठ्याहत्तर फक्त) इतकी रक्कम, त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

६. या बाबीवर होणारा खर्च सन २०२०-२१ या वर्षाकरीता लेखाशिर्ष "०८५३ - अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२ - खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग - वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे देण्याकरीता करण्यात आलेल्या उपलब्ध अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

७. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००९०८१६०२०९९११९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

GAJANAN DHARMA DABHILKAR

Digitally signed by GAJANAN DHARMA DABHILKAR
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c4f6398a3105d0cebbc1a00f25241de3304637656082108e1227c13033d76bfe, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=69c2bd0a657d8ab9b87341301d9ac56408774af7b6416010e1d362583c71ffd6, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=GAJANAN DHARMA DABHILKAR
Date: 2020.09.08 17:46:51 +05'30'

**( ग. ध. दाभिळकर )**
कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग

**प्रति,**

जिल्हाधिकारी, कोल्हापूर.

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यु मरीन लाईन्स, मुंबई - ४०० ०२०.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई- ४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर, कोल्हापूर.
५) वित्त विभाग, (व्यय-९/ अर्थसंकल्प -३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ३२.
६) कार्यासन अधिकारी (ब-१ कार्यासन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.
७) निवडनस्ती “ख” कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.